गोपनीय / तात्काळ

दिनांक ११डिसेंबर,१९९८ रोजी होणा-या कर्मचा-यांच्या लाक्षणिक संपाबाबत करावयाची कार्यवाही.

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक :- एसटीके-१०९८/२०९९/प्र.क्र.४०/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ९ डिसेंबर, १९९८.

:: परिपत्रक ::

राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटना, महाराष्ट्र आणि शासकीय वाहन चालक संघटना, मुंबई यांनी त्यांच्या प्रलंबित मागण्यांकडे शासनाचे लक्ष वेधण्यासाठी दिनांक ११ डिसेंबर,१९९८ रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करणार असल्याची सूचना दिली आहे. त्यानुसार शासनाचे व जिल्हापरिषदांचे गट 'क' व गट 'ड' मधील कर्मचारी संपात भाग घेण्याची शक्यता आहे. जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या संपाबाबत उपाययोजना ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या कक्षेत आहे. शासकीय कर्मचा-यांच्या संपकाळात शासनाचे काम व्यवस्थित चालण्याच्या दृष्टीने पुढे दर्शविल्याप्रमाणे उपाययोजना करण्यात याव्यात :-

१. संपात भाग घेणे ही कृती गैरवर्तणूक समजण्यात येईल व संपात भाग घेणा-या कर्मचा-यांबाबत शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, अशा प्रकारचे आदेश काढावेत व ते सर्व कर्मचा-यांच्या नजरेस आणावेत आणि त्या आदेशाची प्रत नोटीस बोर्डवर लावण्यात यावी.
२. वरील क्र.१मध्ये निर्देशिलेल्या आदेशात असेही स्पष्ट करावे की, राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटना, महाराष्ट्र ही शासन मान्यता प्राप्त संघटना नाही. त्या संघटनेला नियमानुसार शासकीय कर्मचा-यांच्या प्रश्नाचे प्रतिनिधीत्व करण्याचा हक्क पोहोचत नाही. त्यामुळे अशा शासन मान्यता प्राप्त नसलेल्या संघटनेच्या आदेशानुसार कर्मचा-यांनी संपावर जाण्याची कृती करणे हे बाहय दडपण ठरते आणि म्हणून हे सुध्दा शिस्तभंगाच्या कारवाईसाठी गैरवर्तन ठरेल.
३. कर्मचा-यांना संपात भाग न घेण्याविषयी व नेहमीप्रमाणे कामावर उपस्थित राहण्यासाठी त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करावा.
४. संपकाळात कार्यालये उघडी वा बंद करण्याची योग्य ती व्यवस्था करावी व ती व्यवस्था जबाबदार अधिका-याकडे द्यावी.
५. कार्यालय प्रमखांनी संपकाळामध्ये आपले मुख्यालय सोडून जाऊ नये.
६. कार्यालय प्रमुखांनी या आदेशाच्या तारखेपासुन लाक्षणिक संप संपेपर्यंत कुठल्याही शासकीय कर्मचा-यास कुठल्याही प्रकारची रजा मंजूर करु नये आणि जे कर्मचारी रजेवर असतील अशा प्रत्येक प्रकरणी विचार करुन त्यांची रजा रद्द करुन त्यांना कामावर तात्काळ परत बोलवावे किंवा कसे ते ठरवावे.

२. सर्व मंत्रालयीन विभागांनी आपल्या अधिपत्याखालील अत्यावश्यक सेवा संपकाळात सुरळितपणे सुरु राहातील हया संबंधात उपाययोजना कराव्यात.

३. हया परिपत्रकातील सूचना विभाग प्रमुखांनी आपल्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुखांना कळविण्याची व्यवस्था करावी. ग्राम विकास व जलसंधारण विभागाने जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या संपाबाबत योग्य ती उपाय योजना करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

प्रधान सचिव (सेवा)
महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,/ उप मुख्यमंत्री यांचे सचिव.
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव/सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी/सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषदा,
मंत्रालयाच्या विविध विभागांच्या नियंत्रणाखालील इतर सर्व विभागप्रमुख,
☆ प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ न्याय शाखा), मुंबई,
☆ प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
☆ प्रबंधक, लोकायुक्त/उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग.

-----------------

☆ प्रत पत्राद्वारे.